मा. मुंबई उच्च न्यायालयात व नागपूर/ औरंगाबाद खंडपीठ येथे शासनामार्फत दाखल करण्यात येणाऱ्या रिट याचिका, अपिले इ. ई-फाईलिंग प्रणालीद्वारे दाखल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : ३७०-२०२१/संकीर्ण/ई
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २० डिसेंबर, २०२१.

वाचा : मा उच्च न्यायालयाचे महाप्रबंधक यांचे पत्र क्रमांक RG/१६११/९५/२०२१, दिनांक ०४.१२.२०२१

## परिपत्रक :

मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. ०१.०१.२०२२ पासून शासनामार्फत दाखल करण्यात येणारी सर्व न्यायालयीन प्रकरणे/ याचिका ई-फाईलिंग प्रणालीद्वारे दाखल करण्यात यावीत असे निदेश दिले आहेत. सदर निदेशाच्या अनुषंगाने दि. ०६.१२.२०२१ रोजी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे बैठक पार पडली. या बैठकीत मा. सर्वाच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशांचे तंतोतंत पालन करण्याकरिता आवश्यक कार्यवाही करण्याबाबत चर्चा करण्यात आली.

२. त्या अनुषंगाने दि. ०१.०१.२०२२ पासून राज्य शासनाचे सर्व प्रशासकीय विभाग व त्यांची संलग्न कार्यालये यांनी शासनामार्फत दाखल होणारी सर्व न्यायालयीन प्रकरणे/याचिका ई-फायलिंग (e-filing) प्रणालीद्वारे संबंधित सरकारी वकील/ अभियोक्ता यांचेमार्फत दाखल करणे बंधनकारक राहील. अशी प्रकरणे दाखल करताना संबंधित प्रशासकीय विभाग/कार्यालय यांनी संबंधित सरकारी वकील/अभियोक्ता यांचेशी योग्य तो समन्वय साधावा .

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११२२०११४३१७१६१२ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Debashish Chakrabarty
Date: 2021.12.20 12:08:16 +05'30'

**( देबाशिष चक्रवर्ती )**
**मुख्य सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
५. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
६. सहा. सरकारी वकील, उच्च न्यायालय ( मूळ शाखा/ अपील शाखा/रिट शाखा), मुंबई.
७. सहा. सरकारी वकील, उच्च न्यायालय, नागपूर, औरंगाबाद.
८. अ, म व ई शाखा, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.